केंद्र शासन पुरस्कृत "National Programme for Dairy Development" कार्यक्रम राज्यात राबविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एमएलके -२०१४/प्र.क्र. ३७/पदुम ८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ४ ऑगस्ट, २०१४.

संदर्भ :- केंद्र शासनाच्या कृषि विभागाचे पत्र क्र.१-१/२०१२-DP, दि.१५ मे, २०१४.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने १२ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत National Programme for Bovine Breeding and Dairy Development (NPBBDD) हा कार्यक्रम संपूर्ण देशात राबविण्यास संदर्भाधीन पत्रान्वये प्रशासकीय मंजुरी दिली आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-२०१५ या कालावधीत एकूण ३०९.०० कोटी उपलब्ध करुन देण्यात आले असून यापैकी रु.१०५.०० कोटी NPDD या कार्यक्रमाच्या वाटपासाठी उपलब्ध आहेत. राष्ट्रीय दुग्धविकास कार्यक्रमांतर्गत (NPDD) खालील प्रमाणे उद्देश निश्चित करण्यात आले आहेत.

अ) उच्च प्रतीच्या दूध उत्पादनाकरिता पायाभूत सुविधा निर्माण व त्याचे बळकटीकरण करणे. यामध्ये शेतकरी ते ग्राहक या दरम्यान शितसाखळीचा समावेश असेल.

ब) दूध खरेदी, दूध प्रक्रिया व दूध विपणनकरिता पायाभूत सुविधा निर्माण व त्याचे बळकटीकरण करणे.

क) दूध उत्पादक शेतक-यांच्या प्रशिक्षणाकरिता पायाभूत सुविधा निर्माण व त्याचे बळकटीकरण करणे.

ड) ग्रामीण स्तरावर सहकारी संस्था / उत्पादकांचे बळकटीकरण करणे.

**इ) दूध उत्पादनवाढीच्या अनुषंगाने जनावरांचे खाद्य व तत्सम बाबींकरीता तांत्रिक निविष्ठा (Input) पुरविणे.**

**ई) टिकाव धरु शकेल अशा संभाव्य दूध संघ / संस्था यांच्या पुनर्वसनाकरिता सहाय्य करणे.**

उपरोक्त कार्यक्रमांतर्गत खालील घटक वगळता १००% केंद्रीय सहाय्य उपलब्ध होणार आहे.

**१) बल्क मिल्क कुलर्सची स्थापना**

**२) दूध प्रक्रिया सयंत्र**

**३) दूध भुकटी प्रकल्प व**

**४) दूध संघांचे पुनर्वसन**

वरील ४ घटकांना ५०% याप्रमाणे केंद्रीय सहाय्य उपलब्ध होणार आहे. या व्यतिरीक्त सदर कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन पत्रातील ५.१ ते ५.११ मध्ये नमूद केल्यानुसार वेगवेगळया प्रकारे अर्थसहाय्य केंद्र शासनाकडून उपलब्ध होणार आहे. सदर कार्यक्रम राबविण्याकरिता **"राज्यस्तरीय दुग्ध प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा "** म्हणून **"महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या."** या यंत्रणेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय—

शासन या निर्णयाद्वारे केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय दुग्धविकास कार्यक्रमांतर्गत (NPDD)राज्यात दुग्ध प्रकल्प राबविण्याकरीता "राज्यस्तरीय दुग्ध प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा" म्हणून "महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या." या यंत्रणेस घोषित करीत आहे.

महासंघाने केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रातील विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने कार्यक्रमाची अंमलबजावणी होण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही करावी व त्याप्रमाणे राज्यात दुग्ध प्रकल्प राबविण्यासंदर्भात सर्वसमावेशक प्रकल्प अहवाल तयार करावा. सदर अहवालास शासनाची प्रशासकीय मंजुरी प्राप्त करुन घ्यावी व तद्नंतर सदर अहवालाच्या ६ प्रती केंद्र शासनाकडे मान्यतेसाठी पाठवाव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१६४८३६५५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.08.04 18:01:00 +05'30'

(श.मा.साठे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति ,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव

५) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास ,महाराष्ट्र राज्य,वरळी, मुंबई १८.

६) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे १.

७) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगाव (पू.) मुंबई ६५.

८) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,

९) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,

१०) निवड नस्ती